**स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड विद्यापीठाच्या भू-संपादन प्रकरणी न्यायालयाच्या आदेशाप्रमाणे वाढीव मोबदला अदा करण्यासाठी अनुदान उपलब्ध करुन देणेबाबत....**

**महाराष्ट्र शासन**

**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : एसआरटी-२०२३/प्र.क्र.८९/विशि-२**

मंत्रालय विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.

दिनांक : २१ ऑगस्ट, २०२३.

**पहा** :- १. कुलसचिव, स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड यांचे दि.११.०८.२०२३ रोजीचे पत्र.

२. वित्त विभाग शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/ अर्थ-३ दि.१२.०४.२०२३

**प्रस्तावना** : तत्कालीन मराठवाडा विद्यापीठाच्या नांदेड उपकेंद्रासाठी मौजे पांगरी व विष्णुपूरी येथील विविध भूधारकांच्या जमीनी संपादित केल्या आहेत. (आता या उपकेंद्राचे विद्यापीठात रुपांतर झाले असून, सदरहू जमीनी विद्यापीठाच्या वापरात आहेत.) सदरहू भूधारकांनी जमीनीचा मोबदला अत्यल्प असल्याने वाढीव मावेजा मिळण्यासाठी मा.दिवाणी न्यायाधीश वरिष्ठ स्तर, नांदेड येथे एकुण ०८ एलएआर प्रकरण दाखल केले होते. मा.न्यायालयाने प्रकरण निहाय प्रती हेक्टर मोबदला देण्याचे आदेश पारित केले होते. तथापि या निकालाविरुद्ध संबंधित भूधारकांनी मा.उच्च न्यायालय, खंडपीठ औरंगाबाद येथे अपील केले होते. महाराष्ट्र शासनाच्या वतीने जिल्हाधिकारी नांदेड व विशेष भुसंपादन अधिकारी, नांदेड यांना प्रतिवादी करण्यात आले होते. तदनुषंगाने.उच्च न्यायालय खंडपीठ, औरंगाबाद यांनी वादींचे पहिले अपील मंजूर करून वादी यांना प्रति हेक्टर रु.१,७५,०००/- या दराने वाढीव मावेजा देण्याचे आदेशित केले आहे.

तदनंतर मा. उच्च न्यायालयाने देण्यास सांगितलेल्या वाढीव मावेजाची अंमलबजावणी करिता मा.दिवाणी न्यायाधीश वरिष्ठ स्तर, नांदेड येथे स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड यांच्या विरूध्द रेग्युलर दरखास्त दाखल करण्यात आल्या आहेत. तसेच मा.दुसरे सह.दिवाणी न्यायालय, वरिष्ठस्तर, नांदेड यांनी जप्ती आदेश निर्गमित केले आहेत. सदर आदेशाच्या अनुषंगाने जप्ती आदेश टाळण्याकरीता वाढीव मावेजापोटी द्यावयाची रक्कम रु.१,५०,८९,६५४/- विद्यापीठास उपलब्ध करुन देण्याची संदर्भ क्र.१ येथील पत्रान्वये विनंती केली आहे. संदर्भ क्र.२ यथील वित्त विभागाच्या दि.१२.०४.२०२३ च्या परिपत्रकान्वये सन २०२३-२४ मधील निधी वितरीत करण्याबाबतच्या सुचना देण्यात आल्या आहेत. सदरहू सुचनेतील अटींच्या अधिन राहून प्रस्तुत प्रकरणात संपादित जमिनीचा जप्ती वारंट रद्द होणेसाठी वाढीव मावेजा अदा करण्यासाठी स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठास निधी उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u>:-** विद्यापीठाने सादर केलेल्या प्रस्तावानुसार मौजे पांगरी व विष्णुपूरी येथील खालील भूधारकांची जमीनी संपादित केल्या होत्या. याप्रकरणी देण्यात आलेला मूळ भूसंपादन मोबदला, सदरहू मोबदला मान्य नसल्याने वाढीव मावेजासाठी मा.दिवाणी न्यायाधीश, वरिष्ठ स्तर, नांदेड येथे सादर केलेली एल.ए.आर प्रकरणे, या न्यायालयाच्या आदेशाविरूद्ध मा.उच्च न्यायालय मुंबई, खंडपीठ औरंगाबाद येथे दाखल केलेले प्रथम अपील तसेच मा. उच्च न्यायालयाच्या आदेशाची अंमलबजावणी होण्यासाठी दाखल केलेली आर.डी विचारात घेता खालील भूधारकांना वाढीव मावेजा देण्यासाठी खालीलप्रमाणे एकुण रु.१,५०,८९,६५४/- (अक्षरी रुपये एक कोटी पन्नास लक्ष एकोण्णनव्वद हजार सहाशे चोप्पन्न फक्त) एवढा निधी खालील अटींच्या अधिन राहून वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| **अ. क्र.** | **भूधारकांची नावे** | **मावेजा मोबदला (रुपये)** |
|---|---|---|
| १. | श्री.आंनदा गंगाराम हंबर्डे | २५,७०,३०२/- |
| २. | श्री.बाबुराव नागोराव हंबर्डे | ६,१४,६४७/- उर्वरित मावेजा |
| ३. | श्री.भिमराव नागोराव हंबर्डे | |
| ४. | श्री.गोंविद व्यंकटराव हंबर्डे | |
| ५. | श्री.गोविंद व्यंकटराव हवर्डे | २५,१५,३६९/- |
| ६. | श्री.बाळासाहेब नागोराव हंबर्डे | १८,४९,८६१/- |
| ७. | श्री.विठ्ठल मारोती हंबर्डे | ७३,३९,५४६/- |
| ८. | श्री.गोविंद माधवराव हंबर्डे | १,९९,९२९/- |
| | **एकुण** | **१,५०,८९,६५४** |

१. सदरहू मंजूर झालेली तरतुद सदर विद्यापीठास तातडीने सुपूर्द करण्याची सर्वस्वी जबाबदारी संचालक (उच्चशिक्षण) महाराष्ट्र राज्य, पुणे यांची राहील.

२. विद्यापीठास ज्या उद्दिष्टासाठी अनुदान मंजुर केले आहे त्याच उद्दिष्टा साठी अनुदानाचा वापर करावा आणि त्याबाबतचे विनियोग प्रमाणपत्र (Utilisation Certificate) संचालक, उच्चशिक्षण, पुणे यांचे मार्फत शासनास विहित वेळेत सादर करण्यात यावे.

३. वरील अनुदानाची सर्व कागदपत्रे व हिशेब महालेखापाल, महाराष्ट्र-१ किंवा प्रकरणपरत्वे महालेखापाल-२ नागपूर यांनी सदर कामाकरीता प्राधिकृत केलेले अधिकारी यांना तपासण्याचे अधिकार असून, त्यांनी मागणी केल्यास, सर्वकागदपत्रे त्यांच्याकडे तपासणी करीता विद्यापीठाने सादर केली पाहिजेत.

२. सदर खर्च "मागणी क्रमांक - डब्ल्यु-२ प्रधानशिर्ष २२०२, सर्वसाधारण शिक्षण ०३, विद्यापीठीय व उच्चशिक्षण १०२, विद्यापीठांना सहाय्य, - पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, (००) (१९) स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड यांचा विकास (२२०२ ३५४८), ३१ सहाय्यक अनुदाने" या लेखाशिर्षा खाली सन २०२३-२०२४ मधील मंजूर तरतुदीतून खर्ची टाकण्यात यावा.

३. हा शासन निर्णय, महाराष्ट्र विनियोजन अधिनियम २०२३, वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/ अर्थ-३ दि.१२.०४.२०२३ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे. या शासन निर्णयातील परिशिष्ट मधील अनुक्रमांक ९ मध्ये नमूद अटींची पूर्तता होत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०८२१११४०१२३४०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SHARAD SARJERAO KOKATE

Digitally signed by SHARAD SARJERAO KOKATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=be7c6620763057633615219 44ed5ba258ae7d29f78cddb94fc3e83bfa2424200, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=95D25EC736C5F76DA241E96AD9552FF908EFC6582DF4A4ECADD1C4C6CD038195, cn=SHARAD SARJERAO KOKATE
Date: 2023.08.21 11:46:46 +05'30'

**( शरद कोकाटे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा.राज्यपाल तथा कुलपती यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हील, मुंबई.
२. प्रधान सचिव,उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
३. कुलगुरु, स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड.
४. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे, (५ प्रती).
५. कुलसचिव, स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ, नांदेड.
६. जिल्हाधिकारी, जिल्हा नांदेड.
७. उप जिल्हाधिकारी (भूसंपादन), जिल्हा नांदेड.
८. सहसंचालक (उच्च शिक्षण)औरंगाबाद विभाग, औरंगाबाद.
९. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता)-२ महाराष्ट्र, नागपूर.
१०. महालेखापाल, (लेखा परीक्षण) -२ महाराष्ट्र, नागपूर.
११. जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे/नांदेड.
१२. नियोजन विभाग, (का-१४७१) मंत्रालय, मुंबई.
१३. वित्त विभाग, (व्यय-५) ( अर्थसंकल्प-३/८) मंत्रालय, मुंबई.
१४. उप सचिव (विशि), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
१५. कार्यासन अधिकारी (साशि-१), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६. निवडनस्ती (विशि-२), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.